**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनेतर बाबीकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१८ ते जुलै,२०१८ या चार महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-राअआ-२०१८/प्र.क्र. ५७/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - १८ जून, २०१८

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प-३, दि. ०२ एप्रिल, २०१८.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/ का-४/ २०१८-१९, दि. २३/०४/२०१८.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या चार महिन्यांचा वेतनेत्तर खर्च भागविण्याकरिता मंजूर अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (योजनेतर /दत्तमत्त), ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.४४,७०,०००/- (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्र. (१) येथील शासन परिपत्रका मधील मार्गदर्शक सूचनानुसार सन २०१८-१९ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर,२०१८ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत नियतव्ययाच्या एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी ७०% च्या मर्यादेत राहून माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या चार महिन्यांकरिता ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर ) या उद्दिष्टाखाली एकूण रु.१०,४३,०००/- (अक्षरी एकूण रुपये दहा लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतके अनुदान खाली दर्शविलेल्या निधी विवरणाप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण , २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९, ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर ) " | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०१८-१९ साठी अर्थ संकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.) | अर्थसंकल्पीत नियतव्ययाच्या एकूण वार्षिक तरतूदीच्या (७०% नुसार) (रु.) | माहे एप्रिल, २०१८ ते जुलै २०१८ करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह ) (रु.) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ३१,सहायक अनुदाने(वेतनेतर) | ४४,७०,०००/- | ३१,२९,०००/- | २,६०,७५० x ४ = १०,४३,०००/- |
| | **एकूण** | **४४,७०,०००/-** | **३१,२९,०००/-** | **१०,४३,०००/-** |
| **( अक्षरी एकूण रुपये दहा लक्ष त्रेचाळीस हजार फक्त).** | | | | |

२. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१८-१९ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. या आदेशान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात आणि २०१८-१९ मधील माहे एप्रिल, २०१८ ते जुलै,२०१८ मध्ये वितरित करण्यात आलेल्या निधीमधून केलेल्या खर्चाचे तपशीलवार उपयोगिता प्रमाणपत्रे (Utilization Certificate) संपूर्ण माहितीसह (खर्च केलेल्या बाबींची संपूर्ण माहितीसह) स्वतंत्रपणे तात्काळ शासनास सादर करण्यात यावे. अन्यथा पुढील अनुदान वितरण करता येणे शक्य होणार नाही, या बाबतची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग,मुंबई या कार्यालयाची राहिल. तसेच संदर्भ क्र. (१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

३. उपरोक्त निधी "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (योजनेतर /दत्तमत्त ), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग (१) क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प-३, दि. ०२ एप्रिल, २०१८ मधील अटींची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. "

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१८१५५७४२६२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.06.18 16:00:04 +05'30'

**(दि. मा. सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
२) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर,
३) संचालक, लेखा व कोषागारे,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
७) अवर सचिव, (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
८)कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९) निवडनस्ती (कार्यासन-९)